रेण्वीय निदान प्रयोगशाळा सिंधुदुर्ग येथे कोविड-१९ आजाराचे रोग निदान करण्याची सुविधा कार्यान्वित करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
गो. ते. रुग्णालय संकुल इमारत,
१० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
शासन निर्णय क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र. १२०/आरोग्य- ५
दिनांक : ०२ जून, २०२०

संदर्भ :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन पत्र क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र.५८/आरोग्य-५, दिनांक २४.०३.२०२०
२) जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग कार्यालयाचे पत्र क्र. साशा/कोविड-२०१९/प्रयोगशाळा सुविधा/२०२०, दिनांक २५.०५.२०२०.

प्रस्तावना :-

सिंधुदुर्ग जिल्हा मुख्यालयातील सिंधुदुर्ग नगरी येथील आवारात सार्वजनिक आरोग्य विभागाची रेण्वीय निदान प्रयोगशाळेचे बांधकाम पूर्ण झालेले आहे. या प्रयोगशाळेसाठी दि.२२.०३.२०१८ च्या शासन निर्णयानूसार मुनुष्यबळ देण्यासाठी पद निर्मिती करण्यात आलेली आहे. या प्रयोगशाळेत प्रामुख्याने माकडताप आजाराचे निदानासह डेंग्यू, चिकनगुनिया, जापनीज एन्सेफीलायटीस, मेंदूज्वर, विषमज्वर, पटकी, घटसर्प, लेप्टोस्पायरोसीस , शिगेला डिसेंटरी, व्हायरल हेपिटायटीस ए व ई या १० साथरोगातील आजाराचे निदान करण्यासाठी प्रयोगशाळा, उपकरणे, सामुग्री व उपभोग्य वस्तू पुरविल्या आहेत. सदर प्रयोगशाळा ही दि.०१.०४.२०२० पासून पूर्ण क्षमतेने कार्यान्वित होणे अपेक्षित होते. पंरतू लॉकडाऊन परिस्थितीत पद भरती व काही यंत्रसामुग्रीचा पुरवठा अपुरा राहिल्याने ही प्रयोगशाळा पूर्ण क्षमतेने कार्यान्वित होऊ शकलेली नाही. सद्य:स्थितीत या प्रयोगशाळेत लेप्टो, चिकन गुनिया इत्यादी काही रोग निदान चाचण्या होत आहे. आता, याच प्रयोगशाळेत कोविड-१९ निदानासाठी RT PCR चाचणी करण्याचे प्रस्तावित आहे.

सद्य:स्थितीत कोविड-१९ निदानासाठीचे स्वॅब नमुने जिल्हा रुग्णालय सिंधुदुर्ग येथून शासकीय वैद्यकीय महाविद्यालय कोल्हापूर येथे पाठविण्यात येत आहेत. प्रतिदिन साधारणत: ५० ते६० नमुने प्रयोगशाळेत पाठविण्यासाठी प्रति खेप इंधन खर्च ३५०० ते ४००० दरम्यान होत असल्याचे प्रस्तावात नमूद केले आहे. तसेच, प्रयोगशाळेतून तपासणी अहवाल देखील ५ ते ६ दिवसानंतर प्राप्त होत आहेत.

मुंबई, पुणे, ठाणे जिल्हयातून चाकरमानी कुटुंब सिंधुदुर्ग जिल्ह्यात मोठ्या प्रमाणात येत आहेत. यातील बहुतांश कुटुंबे ही कंन्टेमेंट झोन/हॉटस्पॉट झोन/रेड झोन मधील असल्याने, या सर्व नागरिकांचे आयसीएमआरच्या मार्गदर्शक सूचनांनुसार ILI/SARI लक्षणे असल्यास, कोवीड-१९ ची तपासणी करणे अनिवार्य ठरत आहे. या तपासणीसाठी व अहवाल प्राप्तीसाठी लागणारा कालावधी बघता या सर्व नागरिकांना संस्थात्मक विलगीकरण कक्षात ठेवणे आवश्यक असल्याने, प्रशासकीय यंत्रणेवर अनावश्यक ताण येत आहे व मोठ्या प्रमाणात खर्चही होत आहे. ही परिस्थिती बघता रेण्वीय निदान प्रयोगशाळा येथेच RT PCR द्वारे कोविड-१९ तपासणी करण्याचा प्रस्ताव समितीने सादर केला आहे. यासाठी लागणारी

विहित यंत्रसामुग्री जिल्हा नियोजन समितीने यासाठी मान्य केलेल्या निधीतीतून रु.६१,६३,०८८/- (एकसष्ट लाख त्रेसष्ट हजार, अठ्ठयांऐशी फक्त) करण्याचे प्रस्तावित आहे.

संदर्भ क्र. १ मंध्ये नमूद पत्रान्वये, राज्यात कोवीड-१९ चा प्रादुर्भाव रोखण्यासाठी प्रतिबंधात्मक उपाययोजना व उपचारासाठी वैद्यकीय साहित्य व उपकरणे यांची खरेदी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठित समिती यांच्या मान्यतेनुसार व शिफारशीने करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

कोवीड-१९ मुळे उद्भवलेली आरोग्य विषयक आपतकालीन परिस्थिती लक्षात घेता, खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

<u>शासन निर्णय</u> :-

- रेण्वीय निदान प्रयोगशाळा, सिंधुदुर्ग येथे RT PCR तपासणीसाठी मान्यता देण्यात येत आहे.
- रेण्वीय निदान प्रयोगशाळा, सिंधुदुर्ग यासाठी हाफकीन बायो. फार्मा. लि. यांचेकडे यापुर्वी दिलेले पुरवठा आदेशानूसार ज्या उपकरणांचा पुरवठा अद्याप पर्यंत झालेला नाही, त्या उपकरणांच्या मर्यादेत पुरवठा आदेश रद्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
- RT PCR तपासणीसाठी प्रस्तावानूसार आवश्यक उपकरणे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीस शासन पत्र क्र.कोरोना-२०२०/प्र.क्र.५८/आ-५ दि.२४.०३.२०२० मधील नमूद विहित अटी व शर्तीनूसार केंद्र शासन उपक्रम-एच.एल.एल. लाईफ केअर तसेच अन्य शासन उपक्रम के.ए.पी.एल. लाईफ केअर तसेच अनय राज्य शासनाच्या मेडीकल सर्व्हीस कार्पोरेशनचे दरसूची किंवा AIIMS नागपूर यांच्या दि.१८.०३.२०२० च्या पुरवठा आदेशानूसार व जिल्हानियोजन समितीने मान्य केलेल्या निधीतून खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
- शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग दि.२२.०३.२०१८ नूसार रेण्वीय निदान प्रयोगशाळा, सिंधुदुर्ग यांना विहित स्तरावरुन पद भरती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

प्रदीप व्यास
२-६-२०२०

(डॉ. प्रदीप व्यास)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३) जिल्हाधिकारी; जिल्हा सिंधुदुर्ग.
४) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
५) उप संचालक आरोग्य सेवा, कोल्हापूर.
६) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, सिंधुदुर्ग.
७) निवड नस्ती (आरोग्य-५)